**महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी व सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगांव, मुंबई येथील पायाभूत सुविधेच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२३/प्र.क.२९(७)/सांका-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २० मार्च, २०२३

वाचा :

१. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक संकीर्ण-८२२१/प्र.क्र. १८४/ सां.का.-४, दिनांक २८.९.२०२१.
२. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक संकीर्ण-८२२१/प्र.क्र. १८४ (भाग-१)/सां.का.-४, दिनांक १३.१०.२०२१.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक शासाउ-२०२१/प्र.क्र.०९/सा.उ., दिनांक ०१.६.२०२२.
४. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे क्रमांक संकीर्ण-८२२२/प्र.क्र. ४१३/सांका-४, दिनांक १७.०२.२०२३ चे पत्र

**प्रस्तावना :**

भारतीय स्वातंत्र्याला ७५ वर्षे पूर्ण होत असल्याच्या पार्श्वभूमीवर "स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" राज्यात साजरा होत आहे. महोत्सव आयोजनासाठी संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये विविध समित्या गठित करण्यात आल्या आहेत. त्यामध्ये मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखाली कोअर समिती गठीत करण्यात आली आहे. या कोअर समितीने स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत, धोरण समितीने शिफारस केलेल्या कार्यक्रमाच्या आयोजनाची रुपरेषा ठरविणे तसेच निधीच्या नियोजनाबाबत संबंधितांना शिफारस करावयाची आहे. त्यानुसार संदर्भ क्र.४ च्या पत्राअन्वये कोअर समितीच्या दिनांक ५.१२.२०२२ च्या बैठकीत कोअर समितीने महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी व सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव, मुंबई येथील पायाभूत सुविधा उभारण्यासाठी रू.१०० कोटी इतक्या खर्चाच्या कामास मान्यता दिल्याचे इतिवृत्त प्राप्त झाले आहे.

२. सदर निधीमधून करावयाच्या पुढील कामांना महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी व सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, गोरेगाव, मुंबई यांच्या संचालक मंडळाने मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने सदर कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी व सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव, मुंबई येथे पुढील पायाभूत सुविधा उभारण्यासाठी येणाऱ्या रुपये १,०१,९३,००,०००/- (रुपये एकशे एक कोटी त्र्याण्णव लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| **अ.क्र.** | **पायाभूत सुविधांचा तपशील** | **अंदाजित रक्कम (रुपये)** |
|---|---|---|
| १ | चित्रनगरीतील कलागारे क्र. १ ते १६ यांची दुरुस्ती करणे | ३२, ०३,००,०००/- |
| २ | चित्रनगरी हद्दीवरील अस्तित्वातील संरक्षक भिंतीची सुधारणा व नवीन भिंतीचे बांधकाम करणे | १७,०७,००,०००/- |
| ३ | चित्रनगरीतील अंतर्गत रस्ते विकसित करणे | ३९,३३,००,०००/- |
| ४ | चित्रनगरीतील  लहान चित्रीकरणाच्या स्थळांचे सुशोभीकरण करणे | १०,००,००,०००/- |
| ५ | चित्रनगरी परीसरात बाह्य चित्रिकरणासाठी नवीन रेल्वे स्टेशन बनविणे व अस्तित्वातील पोलिस स्टेशनची दुरूस्ती करणे | ३,५०,००,०००/- |
| **एकूण** | | **१,०१,९३,००,०००/-** |

**अटी व शर्तीः**-

i) काम सुरू करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तु विशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरू करावे.

ii) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजत्रक करूनच काम हाती घ्यावे.

iii) संबंधित सक्षम प्राधिकरणाकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

२. सदर बांधकामावरील खर्च “मागणी क्र झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, १०२ कला व संस्कृती प्रचालन, (१३) स्वांतत्र्याचा अमृत महोत्सव (१३)(०१) स्वांतत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५३७३३), ५०, इतर खर्च” या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०३२११९०९१४२७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.21 19:13:49 +05'30'

**( विद्या वाघमारे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी व सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी,गोरेगाव, मुंबई
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१५/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई
१०. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
१३. उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. अवर सचिव (रोख शाखा /सांका-४), पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवडनस्ती/सांका-१.